<u>पदस्थापना</u>
उप अभियंता (यांत्रिकी)
सार्वजनिक बांधकाम विभाग.

**महाराष्ट्र शासन**
**सार्वजनिक बांधकाम विभाग,**
**शासन आदेश क्रमांकः एलटीएस-२०१६/ प्र.क्र.११२/सेवा-२**
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२
तारीख: १०.१.२०१७

<u>संदर्भ</u>- १) शासन आदेश समक्रमांक दिनांक ३१.५.२०१६
२) शासन आदेश,जलसंपदा विभाग क्र.टिएफएस-२०१६/(प्र.क्र.३७/२०१६)/आ(वर्ग-२), दि.२९.६.२०१६

**शासन आदेश :-**

संदर्भ क्र. १ वरील शासन आदेशान्वये श्री. डी. व्ही कान्हेगांवकर व श्री. अजय रामदास पडोळे उप अभियंता (यांत्रिकी) यांना अनुक्रमे सा.बां. (यांत्रिकी) उप विभाग, नांदेड व सा.बां. (यांत्रिकी) उप विभाग, गडचिरोली येथे पदस्थापना देण्यात आली होती. तथापि जलसंपदा विभागाने संदर्भ क्र. २ वरील शासन आदेशान्वये त्यांच्या सेवा सार्वजनिक बांधकाम विभागास उपलब्ध करुन न दिल्याने श्री.कान्हेगांवकर व श्री. पडोळे यांना दिनांक ३१.५.२०१६ च्या आदेशान्वये देण्यात आलेली पदस्थापना, सक्षम प्राधिकाऱ्याच्या मान्यतेने या आदेशान्वये रद्द करण्यात येत आहेत.

२. संदर्भ क्र. १ वरील शासन आदेशान्वये श्री. शिवदास पंढरीनाथ पवळे यांना सा.बां. (यांत्रिकी) उप विभाग, यवतमाळ येथे पदस्थापना देण्यात आली आली होती तथापि जलसंपदा विभागाने संदर्भ क्र. २ वरील शासन आदेशान्वये त्यांची पदस्थापना सा.बां. (यांत्रिकी) उप विभाग, उस्मानाबाद येथे केली असल्याने संदर्भ क्र. १ वरील आदेशातील श्री.पवळे यांच्या पदस्थापनेच्या ठिकाणामध्ये सक्षम प्राधिकाऱ्याच्या मान्यतेने बदल करुन श्री.शिवदास पंढरीनाथ पवळे, उप अभियंता (यांत्रिकी), यांची पदस्थापना आता सा.बां. (यांत्रिकी) उप विभाग, उस्मानाबाद येथे करण्यात येत आहे.

३. संदर्भ क्र. २ वरील शासन आदेशान्वये जलसंपदा विभागाने खालील उप अभियंता (यांत्रिकी) यांच्या सेवा सार्वजनिक बांधकाम विभागास उपलब्ध करुन दिलेल्या आहेत. सदर उप अभियंता (यांत्रिकी) यांना त्यांच्या नावासमोर दर्शविलेल्या ठिकाणी सक्षम प्राधिकाऱ्याच्या मान्यतेने पदस्थापना देण्यात येत आहेत.

| अ.क्र. | उप अभियंता यांचे नांव | पदस्थापनेचे ठिकाण |
|---|---|---|
| १. | श्री. सुरेश किशनराव कहाळेकर | सा.बां. यांत्रिकी उप विभाग, नांदेड |
| २. | श्री. पुरुषोत्तम मनोहर कुलकर्णी | सा.बां. यांत्रिकी उप विभाग, गडचिरोली |
| ३. | श्री. अरविंद महादेव टाकळे | अधीक्षक अभियंता (यांत्रिकी), सा.बां. विभाग, कोकण भवन, नवी मुंबई. |
| ४. | श्री. सतिश नामदेव उदे | सा.बां. यांत्रिकी उप विभाग, अहमदनगर |

३. जलसंपदा विभागाने संदर्भ क्र. २ वरील शासन आदेशान्वये श्री. मनिष माणिकराव बारडकर, उप अभियंता (यांत्रिकी) यांच्या सेवा जलसंपदा विभागाकडे प्रत्यार्पित करुन घेतल्या आहेत. त्यामुळे श्री.बारडकर यांच्या सेवा सार्वजनिक बांधकाम विभागाकडून जलसंपदा विभागास सक्षम प्राधिकाऱ्याच्या मान्यतेने प्रत्यार्पित करण्यास मंजूरी देण्यात येत आहे.

४. उपरोक्त अधिकारी यांनी त्यांच्या नवीन पदाचा कार्यभार त्वरीत स्वीकारावा, त्यांनी अनधिकृतरित्या गैरहजर राहू नये अन्यथा त्यांची अनुपस्थिती अनधिकृत गैरहजेरी म्हणून समजण्यात येईल व विनावेतन करण्यात येईल, तसेच त्यांच्या सेवेत खंड पडण्याची शक्यता देखील नाकारता येत नाही. याची जाणीव सबंधितांना करुन देण्यात येत आहे. तसेच त्यांचे लक्ष शासन परिपत्रक, सामान्य प्रशासन विभाग क्र.सीडीआर-१०८२/२५६७/२८/अकरा, दिनांक ३०.८.१९८२ कडे वेधण्यात येत आहे. सदर परिपत्रकान्वये दिलेल्या सूचना लक्षात घेता, त्यांनी बदली रद्द करण्यासाठी कुठल्याही स्वरुपाची आवेदने सादर केल्यास ते शिस्तभंगविषयक कारवाईस पात्र ठरतील, याचीही नोंद घ्यावी.

५. संबंधित नियंत्रण अधिकाऱ्यांना कळविण्यात येते की, त्यांनी पदमुक्त व पदमोचन अधिकाऱ्यांनी अनुक्रमे पदभार सोडल्याचा व स्वीकारल्याचा दिनांक शासनास त्वरीत कळवावा. विहीत कालावधीत संबंधित अधिकारी त्यांना देण्यात आलेल्या पदस्थापनेच्या ठिकाणी रुजू न झाल्यास, त्याबाबत शासनास त्वरित अवगत करण्यात यावे.

सदर शासन आदेश महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१७०११०१६१४०९००१८ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Arvind J Kamble

Digitally signed by Arvind J Kamble
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Public Works, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=c7145f142d7f8e597c7957f95eeba7e16ac871e58cfc3b203f7c1273111cfb15, cn=Arvind J Kamble
Date: 2017.01.11 12:11:07 +05'30'

**(अ.ज. कांबळे)**
कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन.

**प्रत,**

१. महालेखापाल, १ / २ ( लेखापरीक्षा / लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र राज्य , मुंबई/नागपूर.
२. सचिव, जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई
३. मुख्य अभियंता (यांत्रिकी), जलसंपदा विभाग, नाशिक
४. अधीक्षक अभियंता (यांत्रिकी), सार्वजनिक बांधकाम विभाग, कोकण भवन, नवी मुंबई
५. अधिदान व लेखा अधिकारी मुंबई/बांद्रा
६. जिल्हा कोषागार अधिकारी गडचिरोली/नांदेड/यवतमाळ/उस्मानाबाद/अहमदनगर/ठाणे
७. सर्व संबंधीत उप अभियंता (यांत्रिकी) यांना अधीक्षक अभियंता (यांत्रिकी), सार्वजनिक बांधकाम विभाग, कोकण भवन, नवी मुंबई यांच्या मार्फत.
८. खाजगी सचिव, मा. मंत्री (सा. बां.) (सार्वजनिक उपक्रम वगळून) /मा.मंत्री, सा.बां. (सार्वजनिक उपक्रम) खाजगी सचिव, मा. राज्यमंत्री (सा. बां.) (सार्वजनिक उपक्रम)/मा. राज्यमंत्री, सा.बां., (सार्वजनिक उपक्रम), मंत्रालय, मुंबई.
९. प्रधान सचिव (सा.बां.वि.)/सचिव (रस्ते/बांधकामे) यांचे स्वीय सहायक, सार्वजनिक बांधकाम विभाग, मंत्रालय मुंबई.
१०. निवडनस्ती, सार्वजनिक बांधकाम विभाग, सेवा-२.